# *** दुर्ग दुर्गट भारी ***

## ||||| प्रथम पुष्प : किल्ले रायगड |||||

प्रथमावृत्ती : शिवराज्याभिषेक (ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी : १३ जून २०११)

संपादक : नचिकेत जोशी

सजावट: लास्ट बेंच डिझाईन



जी ११०२, ईटर्निटी

मॅरेथॉन चौक

ठाणे . ४००६०४



# अर्पणपत्रिका

**ही पुस्तिका गडांचा वारसा**

**अनेकार्थांनी जपणा-या**

**सर्व वयाच्या तरुणांना समर्पित.**



# : अनुक्रम :







# ** आडवाटांचे देणे

नमस्कार दोस्तहो!!

रोजच्या धावपळीच्या आयुष्यातून निवांतपणा शोधत डोंगरदऱ्या पालथ्या घालायला सुरुवात करून तुम्हाला अनेक वर्षं झाली असतील. अस्सल ट्रेकरची वर्णने वाचून त्यानुसार स्वत:ला त्यात बसवण्याचा प्रयत्नही करून झाला असेल. मनात आलं की पाठीवर (कायम भरून तयार असलेली) सॅक टाकून भटकणं आता सवयीचं झालं असेल. सगळं जग क्रिकेट मॅच किंवा लग्नसमारंभ अशा मोहमयी गोष्टींत अडकले होते, किंवा थिएटरमधल्या उबदार खुर्च्यांवर बसून थंडगार वातावरणात, अगदी जवळ बसून (कुणाच्या हा प्रश्न तुम्हाला पडला नसणार याची आम्हाला खात्री आहे) वेळ घालवत होते, तेव्हा आपण स्वत: मात्र काय केलं होतं ते आठवतंय ना?

उजाडण्याची वाट बघत रेल्वे प्लॅटफ़ॉर्मवर रात्र काढली होती, वाटेतल्या एखाद्या दगडावरच पाठ टेकवली होतो, सूर्योदय-सूर्यास्ताचे फोटो घ्यायला छाती फुटेपर्यंत कड्याच्या दिशेने धावला होतो, बाहेर पडणाऱ्या पावसाच्या आणि रातकिड्यांच्या किरकिऱ्या म्युझिकच्या साथीने गुहेत ट्रेकी गाण्यांची मैफल भरवली होती. अंधारात, पाऊस तोंडावर झेलत राजांचे मावळे असल्यागत नदी-नाले-चिखलगाळ तुडवला होता (आणि मुक्कामाला पोहोचलो तेव्हा पायातून बूट शेवटी ओढून काढावे लागले होते!)."घरी आराम करायचं सोडून इथे मरायला यायला कुणी सांगितलं होतं" हा प्रश्न जेव्हा जेव्हा पडला होता तेव्हा पुढच्याच वळणावर एखाद्या झऱ्याने, एखाद्या बुलबुल-ससाण्याच्या शर्यतीने, एखाद्या नाजूक फुलाने किंवा आकाशातल्या नक्षत्रांच्या सड्याने त्याचं उत्तर परस्पर देऊन टाकलं होतं.(पुढे पुढे मात्र हा प्रश्न कधी पडलाच नाही!) कुठल्याही ट्रेकमध्ये मिसळ-पाव खाल्ला नाही आणि एकदा तरी निसर्गाच्या सान्निध्यात "दान" केलं नाही तर ट्रेक निष्फळ ठरतो, तसेच ट्रेकमध्ये नैसर्गिक पाणीसाठे सोडून इतरत्र आंघोळ करणे हे पाप असते या विचारांवर निष्ठा ठेऊन राजांच्या जयघोषात कधी तोरणा-राजगड, तर कधी रतनगड-हरिश्चंद्रगड, कधी पन्हाळगड-विशाळगड तर कधी खांडस-भीमाशंकर अशा वाऱ्या केल्या होत्या! (आणि फावल्या वेळात ट्रेकिंगने आम्हाला काय दिलं, किंवा मी ट्रेक का करतो अशा चर्चांमध्येही सहभागी झालो होतो!)





शहरातल्या रंगीबेरंगी दुनियेपेक्षा सह्याद्रीच्या सहवासातली रंगाची दुनिया अधिक मोहक आणि अस्सल आहे हे आपण केव्हाच स्वत:शी कबूल केलं आहे! आणि म्हणूनच एखादा चित्रपट पुन्हा पुन्हा बघावा तसं दर उन्हाळा-पावसाळा-हिवाळयात त्याच ओढीने आजही तेच किल्ले, तेच उतार, तेच बुरूज, तेच दरवाजे, त्याच कातळ-कपारी, त्याच अवघड पायवाटा आपण तुडवत असतो. अर्थात "सर्व प्रकारचे विरोध" (सूज्ञांस अधिक सांगणे नलगे!) मोडून काढून हे करावं लागतं हे खरंच! पण "हे कार्य" व्हावे ही तो श्रींचीच इच्छा!! कदाचित या ट्रेकिंगमुळेच आपण दैनंदिन जीवनातसुद्धा ट्रेकरच्या खाक्यानेच वागतो. कचरा इकडे-तिकडे टाकत नाही, पाणी जपून वापरतो, खिशात सदैव एक टॉर्च घेऊन फिरतो, कशाशीही काहीही तोंडी लावून खाऊ शकतो, कुठेही adjust करू शकतो, इतर पर्यटनस्थळांच्या ठिकाणी चाललेला थिल्लरपणा पाहून आपलं रक्त खवळतं इ. इ.

"दुर्ग दुर्गट भारी" या नव्या ई-पुस्तकांच्या मालिकेत आम्ही आपल्यासोबत करणार आहोत महाराष्ट्रातल्या परिचित-अपरिचित गडकोटांची ई-यात्रा! आपण नवखे असाल तर मार्गदर्शक म्हणून आम्ही आपल्या सोबत असू आणि अट्टल भटके असाल तर आपल्यासाठी ही जुन्या सदाबहार आठवणींची यात्रा असेल. एका पुस्तिकेत एक-दोन किल्ले, त्यांची ऐतिहासिक, भौगोलिक माहिती, वैशिष्ट्ये, प्रवासाचे तपशील इ सर्व माहितीने परिपूर्ण अशी ही मालिका असेल. दुर्गभ्रमंतीचं एक रेकनर म्हणूया हवंतर!

आपल्यासारख्या अट्टल भटक्यांच्या स्वागताला आडवाटाही सजवून सदैव तयार असणाऱ्या आपल्या लाडक्या सह्याद्रीमधल्या दुर्गभ्रमंतीला - चला, निघूया!

**नचिकेत जोशी**

**(संपादक, दुर्ग दुर्गट भारी)**





## ** प्रस्तावना

नमस्ते दोस्तहो!

शिवराज्याभिषेकाचा मुहुर्त धरून यावेळी आपण जाणार आहोत, छत्रपतींची दुसरी राजधानी आणि मराठेशाहीच्या सार्वभौमत्त्वाचं प्रतीक असलेल्या किल्ले रायगडावर!

रायगड न पाहिलेला भटक्या सापडणं हे पावसाळ्यात प्रचीतगडाच्या जंगलात वाट सापडण्याइतकेच अवघड! राजांच्या शेवटच्या ६-७ वर्षांच्या सहवासाचा साक्षीदार असलेला रायगड हा त्याकाळातील बांधकामशास्त्राचा एक अपूर्व नमुना आहे, असं म्हटलं तर गैर ठरणार नाही. रायगडासारखी भव्य आणि मराठी साम्राज्याची राजधानी असलेली पुण्यभूमी कितीही वेळा पहिली तरी कमीच.

रायगड आणि बाकीचे किल्ले यात मला ठळकपणे जाणवणारा फरक हा की बाकीचे किल्ले बांधताना राजांचं बचाव आणि संरक्षण हे मुख्य धोरण होतं. पण रायगडाच्या बांधणीतून या धोरणाबरोबरच मराठी सत्तेच्या स्थापनेबद्दलचा आणि शाश्वततेबद्दलचा निर्वाळा राजांनी दिला. इथे मराठी कारागिरीचे खुले प्रदर्शन आहे. होळीचा माळ असो, बाजारपेठ असो, नगारखाना असो, गंगासागर टाके असो. मराठी सत्तेची ताकद ठसवण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न इथे जागोजागी दिसतो. रायगड बांधणाऱ्या हिराजी इंदलकराला रायगड पाहताना कितीतरी वेळा मनातून सलाम मिळत असेल. तर निघूया शिवतीर्थ रायगडाकडे!

**जय भवानी !**

**जय शिवाजी !!**

## ** भौगोलिक स्थान

किल्ले रायगड हा महाराष्ट्रातील रायगड जिल्ह्यातील (पूर्वीचा कुलाबा जिल्हा) सह्याद्रीच्या पर्वतरांगांत असून समुद्रसपाटीपासून सुमारे ८७० मीटर (२८५१ फूट) उंचीवर आहे.

**अक्षांश- रेखांश -** १८°१४’२.६९" उत्तर व ७३°२६’२४.८३"पूर्व
**दुर्गप्रकार -** डोंगरी किल्ला
**श्रेणी -** सोपी ते मध्यम
**शेजारीपाजारी -**
पूर्वेस लिंगाणा, पूर्वेला आणि उत्तरेला - काळ नदीचे खोरे, पश्चिमेला - गांधारी नदी, आग्नेयेला दूरवर तोरणा, आकाश स्वच्छ असेल तर राजगड.
उत्तरेस - कोकणदिवा, कावल्या-बावल्याचे डोंगर
दक्षिणेस - पोटल्याचा डोंगर. तसेच दूरवर प्रतापगड, मकरंदगड, वासोटा दिसतात.

## ** जाण्याचे मार्ग

जवळचे मोठे गाव - रायगड जिल्ह्यातील महाड - तालुक्याचे गाव. (राष्ट्रीय महामार्ग १७ वर पणजीकडे जाताना, महाडच्या अलिकडे डाव्या हाताला रायगडाची वाट फुटते. इथून रायगड पायथा साधारण २४ किमी).

मुंबईहून त्याचप्रमाणे पुण्याहून महाडसाठी अनेक एसटी आहेत. महाडहून रायगडासाठी साधारण तासातासाला एसटी निघतात. पहिली एसटी पहाटे पाचला सुटते. रायगडाची स्थानमहती पाहता, हल्ली रायगडाला पोहोचणे अतिशय सोपे झाले आहे.

मुंबई, पुणे तसेच साताऱ्यापासून रायगडाच्या पायथ्याशी पोहोचण्यासाठी सारखाच वेळ लागतो. अनुभवी भटके बोराट्याच्या / सिंगापूरच्या नाळेतून उतरून लिंगाणा करून रायगडाकडे (पायी) येतात.

## ** मागोवा इतिहासाचा

रायगडाचे प्राचीन नाव ‘रायरी’ हे होते. मोऱ्यांनी इ.स. १०३० मध्ये हा किल्ला बांधला. युरोपचे लोक त्यास ‘पूर्वेकडील जिब्राल्टर’ असे म्हणत असत. जिब्राल्टरचे ठाणे जितके अजिंक्य तितकाच रायगड अजिंक्य व दुर्गम. पाचशे वर्षांपूर्वी त्यास गडाचे स्वरूप नव्हते व तो नुसता एक डोंगर होता, तेव्हा त्यास ‘रासिवटा’ व ‘तणस’ अशी दोन नावे होती. त्याचा आकार, उंची व सभोवतालच्या दऱ्या यावरून त्यास ‘नंदादीप’ असेही नाव पडले. निजामशाहीत रायगडाचा उपयोग कैदी ठेवण्यापुरता होई. मोऱ्यांचा प्रमुख यशवंतराव मोरे जावळीहून पळून रायगडावर जाऊन राहिला तर प्रतापराव मोरे विजापुरास पळाला. महाराजांनी ६ एप्रिल १६५६ रोजी रायरीस म्हणजेच रायगडास वेढा घातला व मे महिन्यात रायरी महाराजांच्या ताब्यात आली. तेथे असताना, कल्याणचा सुभेदार मुल्ला अहमद खजिना घेऊन विजापूरकडे निघाल्याची बातमी महाराजांना समजली. त्यांनी तो खजिना लुटून रायगडावर आणला व त्या खजिन्याचा उपयोग गडाच्या बांधकामासाठी केला. रायगडाचा माथा राजधानी बनवण्यास सोयीचा व पुरेसा आहे. शत्रूला अवघड वाटणाऱ्या प्रदेशातले ते अधिक अवघड ठिकाण आहे. सागरी दळणवळणासही हे ठिकाण जवळ आहे. म्हणून महारांजांनी राजधानीसाठी या गडाची निवड केली. सभासद बखर म्हणते, ***‘राजा खासा जाऊन पाहता गड बहुत चखोटा. चौतर्फा गडाचे कडे तासिल्याप्रमाणे दिड गांव उंच. पर्जन्यकाळी कड्यावर गवत उगवत नाही आणि धोंडा तासीव एकच आहे. दौलताबाद पृथ्वीवर चखोट गड खरा, परंतु तो उंचीने थोडका. दौलताबादचे दशगुणी गड उंच असे देखोन बहुत संतुष्ट झाले आणि बोलिले, तक्तास जागा हाच गड करावा’.***

शिवराज्याभिषेक हा रायगडाने अनुभवलेला सर्वश्रेष्ठ प्रसंग. महाराजांचा राज्याभिषेक म्हणजे, महाराष्ट्राच्याच नव्हे तर भारताच्या इतिहासातील एक लक्षणीय घटना. गडावरील राजसभेत ता. ६ जून १६७४, ज्येष्ठ शुद्ध १३ शके १५९६, शनिवार या दिवशी राज्याभिषेक साजरा झाला. ता. २४ सप्टेंबर १६७४, ललिता पंचमी आश्विन शुद्ध ५, आनंद संवत्सर शके १५९६ या दिवशी तांत्रिक पद्धतीने राजांनी स्वतःला आणखी एक राज्याभिषेक करून घेतला. शके १५९६, आनंद संवत्सर, माघ वद्य पंचमी- गुरुवार या दिवशी (४ फेब्रुवारी १६७५) संभाजी राजांची मुंज रायगडावर झाली.

लगेच आठ दिवसांनी राजाराम महाराजांचे लग्न प्रतापराव गुजर यांच्या मुलीशी झाले.

रायगडाने अनुभवलेला अत्यंत दुःखद प्रसंग म्हणजे महाराजांचे निधन. शके १६०२ , रुद्रनाम संवत्सरमध्ये, चैत्र शुद्ध पौर्णिमा, हनुमान जयंती, दि. ३ एप्रिल १६८० या दिवशी महाराजांचे निधन झाले. पुढे शके १६०२ रौद्र संवत्सर माघ शु. ७, इ. स. १६८१ १६ फेब्रुवारी या दिवशी रायगडावर संभाजी महारांजाचे विधिपूर्वक राज्यारोहण झाले.

इ. स. १६८४ च्या सप्टेंबरमध्ये औरंगजेबाने रायगडच्या मोहिमेस सुरुवात केली. ता. २१ रोजी शहाबुद्दीन खान यास चाळीस हजार सैन्यासह बादशाहने रायगडाच्या पायथ्याशी धाडले.१५ जानेवारी १६८५ च्या सुमारास शहाबुद्दीने गडाच्या पायथ्याशी असलेल्या एका गावाला आग लावली व लुटालूट चालू केली. पण प्रत्यक्ष  रायगडावर हल्ला न करता तो १६८५ च्या मार्चमध्ये परतला. औरंगजेबाने आपला वजीर आसदखान याचा मुलगा इतिकादखान उर्फ झुल्फिकारखान यास सैन्य देऊन रायगड घेण्यास पाठवले. शके १६१० विभव संवत्सर फाल्गुन शु. ३, १२ फेब्रुवारी १६८९ रोजी राजाराम महाराजांची कारकीर्द सुरू झाली आणि २५ मार्च १६८९ रोजी खानाने गडास वेढा घातला. दि. ५ एप्रिल १६८९ रोजी राजाराम महाराज रायगडावरून निसटून प्रतापगडावर गेले. पुढे जवळजवळ आठ महिने वेढा चालू होता. पण दि. ३ नोव्हेंबर १६८९ रोजी सूर्याजी पिसाळ या किल्लेदाराच्या फितुरीमुळे किल्ला मोगलांना मिळाला. वाईची देशमुखी देण्याचे आमिष दाखवून खानाने त्यास फितुर केले. झुल्फिकारखान हा बादशाहने इतिकादखानला दिलेला किताब आहे. पुढे रायगडचे नामांतर ‘इस्लामगड’ असे झाले. ५ जून १७३३ या दिवशी शाहूमहाराजांच्या कारकिर्दीत रायगड पुन्हा मराठ्यांनी घेतला.

## ** रायगडाचा फेरफटका

रायगड हा विस्ताराने खूप मोठा किल्ला आहे. मराठी साम्राज्याची ही वैभवशाली राजधानी पाहताना मनात भरून राहिलेला असतो तो फक्त अभिमान!

**१. पाचाडचा जिजाबाईंचा वाडा :** उतारवयात जिजाबाईंना गडावरची थंड हवा, वारा मानवत नसे, म्हणून महाराजांनी त्यांच्यासाठी पाचाडजवळच एक वाडा बांधून दिला. तोच हा मासाहेबांचा राहता वाडा. वाडाची व्यवस्था ठेवण्यासाठी काही अधिकारी तसेच शिपायांची व्यवस्थाही महाराजांनी केली होती. पायर्‍यांची एक उत्तम विहीर, तसेच जिजाबाईंना बसण्यासाठी केलेले दगडी आसन बघण्यासारखे आहे. यास ‘तक्क्याची विहीर’ असेही म्हणतात.

**२. खूबलढा बुरूज :** गड चढू लागले म्हणजे एक बुरुजाचे ठिकाण दिसते, तोच हा सुप्रसिद्ध खूबलढा बुरूज. बुरुजाशेजारी एक दरवाजा होता, त्यास ‘चित् दरवाजा’ म्हणत पण हा दरवाजा आता पूर्णपणे उध्वस्त झाला आहे.

**३. नाना दरवाजा :** या दरवाजास ‘नाणे दरवाजा’ असेही म्हणत. या दरवाजाचा संबंध नाना फडणिसांशी लावला जातो अशी गैरसमजूत आहे. नाना दरवाजा याचाच अर्थ लहान दरवाजा. इ. स. १६७४ च्या मे महिन्यात राज्याभिषेकाच्या निमित्ताने इंग्रजांचा वकील हेन्री ऑक्झेंडन याच दरवाजाने आला होता. या दरवाज्यास दोन कमानी आहेत. दरवाज्याच्या आतील बाजूस पहारेकर्‍यांसाठी दोन लहान खोल्या आहेत. त्यांस ‘देवडा’ म्हणतात. दरवाजास अडसर घालण्यासाठी खोबणी दिसतात.

**४. मदारमोर्चा किंवा मशीदमोर्चा :** चित् दरवाज्याने गेल्यावर नागमोडी वळणे घेत गेलेल्या रस्त्याने पुढे गेल्यावर एक सपाटी लागते. या मोकळ्या जागेत टोकाशी दोन पडक्या इमारती दिसतात. त्यापैकी एक पहारेकर्‍यांची जागा असून दुसरे धान्याचे कोठार आहे. येथे मदनशहा नावाच्या साधूचे थडगे आहे. तेथे एक प्रचंड तोफही दिसते. येथून पुढे गेल्यावर खडकात खोदलेल्या तीन गुहा दिसतात.

**५. महादरवाजा :** महादरवाज्याच्या बाहेरील अंगास वर दोन्ही बाजूस दोन सुंदर कमळाकृती कोरल्या आहेत. दरवाज्यावर असणाऱ्या या दोन कमळांचा अर्थ म्हणजे किल्ल्याच्या आत 'श्री आणि सरस्वती' नांदत आहे. 'श्री आणि सरस्वती' म्हणजेच 'विष्णु व लक्ष्मी' होय. महादरवाज्याला दोन भव्य बुरूज असून एक ७५ फूट तर दुसरा ६५ फूट उंच आहे. तटबंदीमध्ये जी उतरती भोके ठेवलेली असतात त्यास 'जंग्या' म्हणतात. शत्रूवर मारा करण्यासाठी ही भोके ठेवलेली असतात. बुरुजांमधील दरवाजा हा वायव्य दिशेस तोंड करून उभा आहे. महादरवाज्यातून आत आल्यावर पहारेकऱ्यांच्या देवडा दिसतात तसेच संरक्षकांसाठी केलेल्या राहण्याच्या खोल्या दिसतात. महादरवाज्यापासून उजवीकडे टकमक टोकापर्यंत तर डावीकडे हिरकणी टोकापर्यंत तटबंदी बांधलेली आहे.

**६. चोरदिंडी :** महादरवाज्यापासून उजवीकडे टकमक टोकापर्यंत जी तटबंदी जाते, त्यावरून चालत गेल्यास जिथे ही तटबंदी संपते, त्याच्या थोडे अलीकडे बुरुजात ही चोरदिंडी बांधलेली आहे. बुरुजाच्या आतून दरवाजापर्यंत येण्यासाठी पायऱ्या आहेत.

**७. हत्ती तलाव :** महादरवाज्यातून थोडे पुढे आल्यावर जो तलाव दिसतो तो हत्ती तलाव. गजशाळेतून येणाऱ्या हत्तींच्या स्नानासाठी आणि पिण्यासाठी या तलावाचा उपयोग होत होता.

**८. गंगासागर तलाव :** हत्तीतलावापासून जवळच रायगड जिल्हा परिषदेच्या धर्मशाळेच्या इमारती दिसतात. धर्मशाळेपासून दक्षिणेकडे अंदाजे ५० -६० पावले चालत गेल्यास जो तलाव लागतो तो गंगासागर तलाव. महाराजांच्या राज्याभिषेकानंतर सप्तसागर व महानांची आणलेली तीर्थेयाच तलावात टाकली गेली. म्हणूनच याचे गंगीसागर असे नाव पडले. शिवकाळात शिबंदीसाठी याचे पाणी वापरण्यात येई.

**९. स्तंभ :** गंगासागराच्या दक्षिणेस दोन उंच मनोरे दिसतात. त्यासच स्तंभ म्हणतात. जगदीश्वराच्या शिलालेखामध्ये ज्या स्तंभांचा उल्लेख केला आहे, ते हेच असावेत. ते पूर्वी पाच मजले होते असे म्हणतात. ते द्वादश कोनी असून बांधकामात नक्षीकाम आढळते.



**१०. पालखी दरवाजा :** स्तंभांच्या पश्चिमेस भिंत असलेल्या भागातून ३१ पायऱ्या बांधलेल्या दिसतात. त्या चढून गेल्यावर जो दरवाजा लागतो तो पालखी दरवाजा. या दरवाज्यातून आपल्याला बालेकिल्ल्यात प्रवेश करता येतो. पाहुणे किंवा आप्त मंडळींच्या प्रवेशासाठी हा दरवाजा होता. ह्या दरवाजाच्या जवळ ही विस्तिर्ण जागा दिसते. ही पालखी उतरविण्याची जागा होती. पालखी दरवाजाच्या डाव्या बाजुला मनोऱ्यामध्ये एक छोटासा अरवाजा दिसतो. तो सेवेकरी दरवाजा. सेवेकरी मंडळी ह्या दरवाजाचा वापर करीत असावीत.

**११. मेणा दरवाजा :** पालखी दरवाज्याने वर प्रवेश केला की, चढ-उतार असलेला एक सरळ मार्ग आपल्याला मेणा दरवाजापर्यंत घेऊन जातो. उजव्या हातास जे सात अवशेष दिसतात ते आहेत राण्यांचे महाल. मेणा दरवाज्यातून बालेकिल्ल्यावर प्रवेश करता येतो.

**१२. राजभवन :** राणीवशाच्या समोर डाव्या हातास दासदासींच्या मकानांचे अवशेष दिसतात. या अवशेषांच्या मागे दुसरी जी समांतर भिंत आहे त्या भिंतीच्या मध्यभागी जो दरवाजा आहे तेथून बालेकिल्ल्याच्या अंतर्भागात प्रवेश केला की जो प्रशस्त चौथरा लागतो तेच हे महाराजांचे राजभवन. राजभवनाचा चौथारा ८६ फूट लांब व ३३ फूट रुंद आहे.

**१३. रत्नशाळा :** राजप्रासादाजवळील स्तंभांच्या पूर्वेकडे असलेल्या मोकळ्या जागेत एक तळघर आहे, तीच ही रत्नशाळा. हा खलबतखाना म्हणजेच गुप्त बोलणी करण्यासाठी केलेली खोली असावी असेही म्हणतात.

**१४. राजसभा :** महाराजांचा राज्याभिषेक जेथे झाला, तीच ही राजसभा. राजसभा २२० फूट लांब व १२४ फूट रुंद आहे. येथेच पूर्वेकडे तोंड केलेली सिंहासनाची जागा आहे. येथे बत्तीस मणांचे सोन्याचे सिंहासन होते. सभासद बखर म्हणते, 'तख्त सुवर्णाचे बत्तीस मणांचे सिद्ध करवले. नवरत्ने अमोलिक जितकी कोशात होती, त्यामध्ये शोध करून मोठी मोलाची रत्ने जडाव केली.'



**१५.नगारखाना :** सिंहासनाच्या समोर जे भव्य प्रवेशद्वार दिसते तोच हा नगारखाना. हे बालेकिल्ल्याचे मुख्य प्रवेशद्वार आहे. नगारखान्यातून पायर्‍या चढून वर गेले की आपण किल्ल्यावरील सर्वाधिक उंचीवर असतो.

**१६.बाजारपेठ :** नगारखान्याकडून आपण डावीकडे उतरून आलो की, समोर जी मोकळी जागा दिसते तो ‘होळीचा माळ’. तेथेच आता शिवछत्रपतींचा भव्य पुतळा बसवलेला आहे. पुतळयासमोर जे दोन रांगांमध्ये भव्य अवशेष दिसतात तीच शिवकाळातील बाजारपेठ. पेठेच्या दोन रांगात प्रत्येकी २२ दुकाने आहेत. मधून जवळजवळ चाळीस फूट रुंद रस्ता आहे. घोड्यावर बसल्याबसल्या खरेदी करता यावी म्हणून दुकाने विशिष्ट उंचीवर बांधण्यात आली असावीत.

**१७. शिर्काई देऊळ :** महाराजांच्या पुतळयाच्या डाव्या बाजूस जे छोटे देऊळ दिसते ते शिर्काईचे देऊळ. शिर्काई ही गडावरील मुख्य देवता.

**१८. जगदीश्वर मंदिर :** बाजारपेठेच्या खालच्या बाजूस पूर्वेकडील उतारावर ब्राह्मणवस्ती, ब्राह्मणतळे वगैरे अवशेष दिसतात. तेथूनच समोर जे भव्य मंदिर दिसते तेच महादेवाचे म्हणजे जगदीश्वराचे मंदिर. मंदिरासमोर नंदीची भव्य आणि सुबक मूर्ती आहे. पण सध्या ही मूर्ती भग्नावस्थेत आहे. मंदिरात प्रवेश केला की भव्य सभामंडप लागतो. मंडपाच्या मध्यभागी भव्य कासव आहे. गाभार्‍याच्या भिंतीस हनुमंताची भव्य मूर्ती दिसते. मंदिराच्या प्रवेशद्वाराच्या पायर्‍यांच्या खाली एक लहानसा शिलालेख दिसतो. तो पुढीलप्रमाणे, ‘सेवेचे ठायी तत्पर हिरोजी इटळकर’ या दरवाजाच्या उजव्या बाजूस भिंतीवर एक सुंदर शिलालेख दिसतो, त्याचा थोडक्यात अर्थ पुढीलप्रमाणे -

*‘सर्व जगाला आनंददायी असा हा जगदीश्वराचा प्रासाद श्रीमद् छत्रपती शिवाजी राजा यांच्या आज्ञेने शके १५९६ मध्ये आनंदनाम संवत्सर चालू असताना सुमुहुर्तावर निर्माण केला. या रायगडावर हिरोजी नावाच्या शिल्पकाराने विहिरी, तळी, बागा, रस्ते, स्तंभ, गजशाळा, राजगृहे आशांची उभारणी केली आहे. ती चंद्रसूर्य असेतोवर खुशाल नांदो.’*

**१९. महाराजांची समाधी :** मंदिराच्या पूर्वदरवाजापासून थोडा अंतरावर जो अष्टकोनी चौथरा दिसतो तीच महाराजांची समाधी. सभासद बखर म्हणते,

*'क्षत्रियकुलावतंस श्रीमन्महाराजाधिराज शिवाजी महाराज छत्रपती यांचा काल शके १६०२ चैत्र शुद्ध १५ या दिवशी रायगड येथे झाला. देहाचे सार्थक त्यांनी बांधिलेला जगदीश्वराचा जो प्रासाद त्याच्या महाद्वाराच्या बाहेर दक्षिणभागी केले. तेथे काळ्या दगडाच्या चिऱ्याचे जोते अष्टकोनी सुमारे छातीभर उंचीचे बांधिले असून वरून फरसबंदी केलेली आहे. फरसबंदीच्या खाली पोकळी आहे, तीत महाराजांचा अवशिष्टांश रक्षामिश्र मृत्तिकारुपाने सापडतो.' दहनभूमी पलीकडे भग्न इमारतींच्या अवशेषांची एक रांग आहे, ते शिबंदीचे निवासस्थान असावे. त्याच्या पलीकडे सदर वस्तीपासून विलग असा एक घराचा चौथरा दिसतो. हे घर इ. स. १६७४ मध्ये इंग्रज वकील हेन्री ऑक्झेंडन यास राहावयास दिले होते. महाराजांच्या समाधीच्या पूर्वेकडे भवानी टोक आहे तर उजवीकडे दारूची कोठारे, बारा टाकी दिसतात.*

**२०. कुशावर्त तलाव :** होळीचा माळ डाव्या हातास सोडून उजवीकडील वाट कुशावर्त तलावाकडे जाते. तलावाजवळ महादेवाचे छोटेसे देऊळ दिसते. देवळासमोर फुटलेल्या अवस्थेत नंदी दिसतो.

**२१. वाघदरवाजा :** कुशावर्त तलावाजवळून घळीने उतरत वाघ दरवाजाकडे जाता येते. आज्ञापत्रात लिहिले आहे की, 'किल्ल्यास एक दरवाजा थोर आयब आहे, यांकरीता गड पाहून एक दोन – तीन दरवाजे, तशाच चोरदिंडा करून ठेवाव्या. त्यामध्ये हमेशा राबत्यास पाहिजे तितक्या ठेवून वरकड दरवाजे व दिंडा चिणून टाकाव्या.' हे दूरदर्शीपणाचे धोरण ठेऊनच महाराजांनी महादरवाजाशिवाय हा दरवाजा बांधून घेतला. या दरवाज्याने वर येणे जवळजवळ अशक्यच असले तरी दोर लावून खाली उतरू शकतो. पुढे राजाराम महाराज व त्यांची मंडळी झुल्फिरखानाचा वेढा फोडून याच दरवाज्याने निसटली होती.

**२२. टकमक टोक :** बाजारपेठेच्या समोरील टेपावरून खाली उतरून टकमक टोकाकडे जाता येते. तेथेच एका दारूच्या कोठाराचे अवशेष दिसतात. जसजसे आपण टोकाकडे जातो तसतसा रस्ता निमुळता होत जातो. उजव्या हाताला सरळ तुटलेला २६०० फूट खोल कडा आहे. टोकावर वारा प्रचंड असतो व जागाही कमी असल्यामुळे गोंधळ न करता सावधानता बाळगावी. (अलीकडे टकमक टोकाकडे जाणाऱ्या संपूर्ण सोंडेवर दोन्ही बाजूला संरक्षक पाईप बांधण्यात आले आहेत.)



**२३. हिरकणी टोक :** गंगासागराच्या उजवीकडे पश्चिमेस जी चिंचोळी वाट जाते ती हिरकणी टोकाकडे जाते. हिरकणी टोकाशी संबंधित हिरकणी गवळणीची एक कथा सांगितली जाते. या बुरुजावर काही तोफाही ठेवलेल्या दिसतात. बुरुजावर उभे राहिले तर डाव्या हाताला गांधारीचे खोरे, उजव्या बाजूला काळ नदीचे खोरे दिसते. तसेच इथून पाचाड, खुबलढा बुरूज, मशीद मोर्चा ही ठिकाणे तोफेच्या माऱ्यात आहेत. त्यामुळे युद्धशास्त्राच्या तसेच लढाऊ दृष्टीने ही खूप महत्त्वाची आणि मोक्याची जागा आहे.

**२४. लोहस्तंभ:** चित्त दरवाजापासून सुमारे १५०० पायऱ्या चढून आपण वर आलो की, आपल्याला एक लोहस्तंभ दिसतो. मल्लखांभासारखा दिसणारा हा स्तंभ हत्ती बांधण्यासाठी वापरला जात असावा! ह्या स्तंभाच सुक्ष्म निरिक्षण केलं तर आपल्याला काही कोरलेली अक्षरं दिसतातं. ही पुसट असल्याने त्यांचं नेमकं अनुमान लावता येत नाही.

**२५. अष्टप्रधानांचे वाडे :** मेणा दरवाजापासून आपण पूर्वेला आलो की, अष्ट प्रधान मंत्रीमंडळाचे वाडे दिसतात. तेथून पूर्वेला थोडे अंतर गेल्यावर आपल्याला मोरोपंत, नेताजी पालकर आणि येसाजी कंक ह्यांच्या समाध्या दिसतात. ह्या वाड्यापासून जवळच कुशांवत तलाव आणि शिवमंदिर आहे.

**२६. टांकसाळ :** राजवाड्यात प्रवेश केल्यानंतर एक छोटसं कोटार दिसतं. ते टांकसाळ. या ठिकाणी शिवकालीन नाणी तयार केली जात. त्याच्याच बाजुला तळाग्रात एक अंधारी खोली दिसते. इथे महत्वाची मसलत चालत असे.

**२७. बाराटाकी :** जगदीश्वराच्या मंदिरापासून उत्तरेला थोड चालत आलो की, आपल्याला पाण्याच्या टाकी दिसतात. तीच बाराटाकी. ही टाकी बारा आहेत म्हणून ती बाराटाकी या नावाने ओळखली जातात. पावसाच पाणी ह्या टाक्यांमध्ये साठविलं जात होतं. बाराटाकीच्या बाजूलाच दारू कोटार दिसतं.





## ** अवांतर

शिवराय आणि कविराज भूषण यांची पहिली भेट झाली ती रायगडावरच. कवी भूषण रायगडाचे वर्णन करतो की, *‘शिवाजीने सर्व किल्ल्यांचा आधार व विलासस्थान अशा रायगड किल्ल्यास आपले वसतीस्थान केले. हा किल्ला एवढा प्रचंड आणि विशाल आहे की, त्यात तीनही लोकीचे वैभव साठवले आहे. गडावर विहिरी, सरोवरे, कूप विराजत आहेत. सर्व यवनांना जिंकून रायगडावर राजा शिवाजीने राजधानी केली आणि लोकांचे इच्छित पुरवून जगतात श्रेष्ठ यश संपादन केले.’*

### रायगडावरील अश्मयुगीन गुहा :

पाचाड खिंडीत रायगडाच्या विरुद्ध दिशेस अवघ्या ४-५ मिनिटांच्या चढणीवर एक गुहा आहे. तिला म्हणतात "वाघबीळ’ किंवा "नाचणटेपाची गुहा!’ नवे ट्रेकर्स या गुहेला "गन्स ऑफ पाचाड’ असे म्हणू लागले आहेत. जगातील इतर सर्व गुहांपेक्षा या गुहेची रचना पूर्ण वेगळी आहे. पाचाड खिंडीतून इथवर चढून आले की गुहेचे एक तोंड दिसते. या तोंडातून आत गेले की समोर येणारे दृश्य अचंबित करणारे आहे. दोन गोलाकृती प्रचंड भोके पलीकडील बाजूला आहेत. तिथवर गेले, की पाचाडचा भुईकोट किल्ला, पाचाड गाव व पाचाडपासून ते पाचाड खिंडीकडे येणारा घाटरस्ता व्यवस्थित पाहता येतो. या गुहेत सतत एकापाठोपाठ येणाऱ्या थंड वाऱ्याच्या झुळका आपला सारा थकवा दूर करतात. रायगड पाहायला शेकडो-हजारो दुर्गयात्रींना या वाघबीळ गुहेची कल्पनाच नसते. अश्मयुगीन मानवाचे जुने वसतिस्थान, ३ तोंडे असणारी गुहा, तेथून दिसणारा उत्कृष्ट देखावा, सतत वाहणारा थंड वारा यांची अपूर्वाई येथे भेट देणाऱ्याला जाणवते.



## ** ट्रेकर्ससाठी उपयुक्त माहिती

**गडावरील राहायची सोय -** रायगड जिल्हा परिषदेच्या धर्मशाळेमध्ये राहण्यासाठी खोल्या उपलब्ध आहेत. तसेच MTDC Quarters किंवा डॉर्मेंटरीजमध्येही सोय होऊ शकते. खाजगी घरांमध्ये तसेच मिलेनियम प्रॉपर्टीज् च्या कॉटेजेस् मध्ये सुद्ध सोय होऊ शकते. त्यासाठी लिंक -

http://www.raigadropeway.com/Raigad%20Ropeway.htm

**गडावरील खाण्याची सोय -** खाजगी तसेच MTDC hotel मध्ये.

**गडावरील पाण्याची सोय -** पाण्याचे अनेक तलाव गडावर आहेत. पाणी मुबलक.

**गडावर जाण्याच्या वाटा -**

१. पायऱ्या (चित् दरवाज्यापासून अंदाजे १४०० पायऱ्या, नवख्यांसाठी साधारण दीड ते दोन तास)

२. रोपवे (बसल्यापासून ४ मिनिटात रायगडावर!)

# map


दुर्ग दुर्गट भारी
सातविणीचा खळगा
भवानी मंदीर
कोळींब तलाव
निवडूंगाचा खळगा
श्रीसमाधी
जगदीश्वर मंदीर
टकमक टोक
दारूकोठार
टकमकीचा खळगा
हनुमान टाके
बाजारपेठ
लोखंडी
हत्तीखाना
हत्ती तलाव
धर्मशाळा
शिरकाई देवी
गंगासागर
पुतळा
होळीचा माळ
महादरवाजा
पालखी दरवाजा
मीनार
राज्यसभागृह
राजवाडा परीसर
कुशावर्त तीर्थ
काशीबाई समाधी
बाराटाकी
दारूकोठार
बाराटाकीचा खळगा
वाघदरवाजा
पोटल्याचा डोंगर
मशीद मोर्चा
समाधी
हिरकणी बुरूज
MTDC
मेणा दरवाजा
काळखाईचा खळगा
खुबलढा बुरूज
दरवाजा
रायगड रोप-वे
दुर्ग रायगड




छत्रपती श्री शिवाजी महाराज
यांची समाधी
Samadhi of
Chhatrapati Shri Shivaji Maharaj












जिजाऊ
समाधी उद्यान,




छत्रपती शिवाजी महाराजांचे आज्ञापत्र..!
आरमारास तख्ते, सोट, डोलाच्या काठ्या आदिकरून थोर लाकुड असावे लागते. ते आपले राज्यात अरण्या-मध्ये सागवानादि वृक्ष आहेत त्यांचे जे अनुकूल पडेल ते हुजुर लेहून हुजरचे परवानगीने तोडून न्यावे. याविरहीत जे लागेल ते परमुलकीहून खरेदी करून आणवित जावे. स्वराज्यातील आंबे, फणस आदिकरून हेही लाकडे आरमाराचे प्रयोजनाची. परंतु त्यांस हात लाऊ न द्यावा. काय म्हणोन की ही झाडे वर्षा दो वर्षांनी होतात ऐसे नाही. रयतेने ही झाडे लाऊन लेकरासारखी बहुतकाळ जतन करून वाढविली. ती झाडे तोडिलियावरी त्यांचे दुःखास पारावार काय? येकास दुःख देऊन जे कार्य करीन म्हणेल ते कार्य करणारासहीत स्वल्पकालेच बुडोन नाहिसे-च होते. किंबहुना धन्याचेच पदरी प्रजापीडणाचा दोष पडतो. या वृक्षांच्या अभावे हानिही होते. याकरीता हे गोष्ट सर्वथा होऊ न द्यावी. कदाचित येखादे झाड जे बहुत जीर्ण होऊन कामातुन गेले असेल तरी त्याचे धन्यास राजी करून द्रव्य देऊन त्याच्या संतोषे न्यावे. बलात्कार सर्वथा न करावा.'

*( १४ जून २००८ च्या महाराष्ट्र टाईम्स च्या अंकात शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे यांचा रायगडावर एक सुंदर लेख आला होता. त्यातील काही भाग खास आपल्यासाठी - )*

# हिराजी इंदुलकर आणि किल्ले रायगड

- बाबासाहेब पुरंदरे (महाराष्ट्र टाईम्स, १४ जून २००८)

रायगड किल्ला हा तत्कालीन लष्करी दृष्टीने अभ्यास करण्यासारखा किल्ला आहे. एखाद्या ताटात भाताची मूद ठेवावी तसा हा सर्व बाजूंनी अलिप्त असा डोंगर आहे. रायगड सह्याद्रीचा पराक्रमी पुत्रच आहे. रायगडाची प्रत्येक दिशा केवळ अजिंक्य आहे. भिंतीसारखे ताठ सरळ कडे पाहिले की , असं वाटतं , हा गड आपल्या अंगावर येतोय. पावसाच्या दिवसांत अन् त्यातल्या त्यात आषाढी पावसांत रायगड चढून जाणं हा एक अघोरी आनंद आहे. आषाढी ढगांची फौज गडाला गराडा घालून तांडव करीत असते. कधीकधी त्यातच वादळ घुसते अन् मग होणारा ढगांचा गडगडाट आणि विजांचाही कडकडाट आपण कधी अनुभवला आहे का ? वेळ दिवस मावळण्याची असावी , हे सारं थैमान सुरू झालेलं असावं अन् आपण गडावरच्या नगारखान्याच्या उत्तुंग माथ्यावर उभे असावं.

रणवाद्यांचा बेताल कल्लोळ , शिंगतुताऱ्यांचा आणि शंखांचा अचानक आक्रोश , रुदवीणांच्या तारा तुटाव्यात असा विजांचा सणाणत सणाणत उठणारा चित्कार पावसाच्या भयंकर वर्षावात डोळे उघडता येत नाहीत पण उघडले तर अवतीभवतीचा तो महाप्रलय कल्लोळ भयभयाट करीत आपल्याला गदागदा हलवत असतो. तो प्रलयंकाल , महारुद , क्षुब्ध सहस्त्रशीर्ष , दुर्गेश शिवशंकर आणि सर्व संहारक चंडमुंडभंडासुरमर्दिनी , उदंडदंड महिषासुरमर्दिनी महाकालिका दुर्गाभवानी भयंकर रौद तांडव एकाचवेळी करीत आहेत असा भास व्हायला लागतो. कभिन्न अंधार वाढतच जातो. रायगड हे सारं तांडव आपल्या खांद्यावर आणि मस्तकावर झेलीत उभा असतो. अन् त्याही भयानक क्षणी आपल्याला वाटायला लागतं , अर्जुनाला दिसलेलं कुरूक्षेत्रावरचं ते भयप्रद दर्शन यापेक्षाही किती भयंकर असेल!

दिवे लावण्याकरता सुंदर कोनाडे आहेत. झरोक्यांवर पडदे सोडण्याकरता गोल कड्याही ठेवल्या आहेत. आबदारखाना , फरासखाना , शिलेखाना , जिन्नसखाना , दप्तरखाना , जामदारखाना , मुदपाकखाना इत्यादी सारे महाल , दरख आणि कोठ्या गडावर बयाजवार होत्या. रात्री सगळीकडे दिवेलागण व्हायची. नगारखाना कडकडायचा. सनईचे सूर कोकणदिव्याला साद घालायचे. गडाचे सारे दरवाजे कड्याकुलुप घालून बंद व्हायचे. तोफ उडायची. गस्तीच्या पाहरेकऱ्यांच्या आरोळया लांबून लांबूनही उठायच्या. मशाली पेटायच्या. अन् सारे व्यवहार तेवढ्या प्रकाशात गडावर चालायचे. देवघरात अन् राजवाड्यात उदाधुपाचे अन् चंदनाचे सुगंध दरवळायचे. अन् देवघरात जगदंबेची आरती निनादायची. असा रायगड डोळयापुढं आला की मन फार सुखावतं. आजचा उद्ध्वस्त भकास आणि आम्ही लोकांनीही सिगरेटची थोटकं , दारुच्या रिकाम्या बाटल्या , अन् खरकटे प्लॅस्टिकचे कागद आणि पिशव्या अस्ताव्यस्त फेकून अन् ठिकठिकाणी भिंतींवर आपली नावं लिहून विदुप केलेला गड पाहिला की , स्वत:च्याच मनाला सुरूंग लागतो. त्याच्या चिंधड्या उडतात. अन् वाटतं , ' तुझ्या विछिन्न रूपाला , पाहुनि फाटतो ऊर.'

# तख्तास जागा हाच गड करावा...

- सौरभ वैशंपायन

"गडांचा राजा आणि राजांचा गड" या सदरात येणारा दुसरा गड अर्थात रायगड. हि स्वराज्याची दुसरी राजधानी. चंद्रराव मोरेच्या प्रकरणात महाराजांना जावळित उतरावे लागले. शिवकांळात जावळी परीसरात मोरे, शिर्के, सावंत, हबशी, सुर्वे, दळवी, यांची घराणी वर्चस्व राखुन होती. यांपैकी खेळाणा(विशाळगड) किल्ल्यावरील मोरे हे स्वतंत्र राज्य राखुन होते व उरलेल्या ७ मोरे घराण्यांनी आपला एक प्रमुख निवडुन त्याला "चंद्रराव" किताब दिला. शिवकाळात "चंद्रराव" हा किताब महिपतगडावरील "दौलतराव मोरे" हा पुरुष राखुन होता. "दौलतराव मोरे" ह्याचे निधन झाल्यावर त्याच्या दत्तक पुत्राला – यशवंतरावाला "चंद्रराव" किताब देण्यास विजापुरच्या आदिलशहाने विरोध केला. तेव्हा दौलतरावाची विधवा पत्नी "माणकाई" हिने शिवरायांकडे मदत मागितली. स्वराज्य कार्यात एक मात्तबर माणूस हाताशी येईल असा विचार करुन महाराजांनी चाळिशी उलटून गेलेल्या "मुलाला", "चंद्रराव" किताब मिळवुन दिला. काही काळाने आदिलशाहिचा विरोध शमल्यावर यशवंतरावाने शिवरायांशी बेबनाव मांडला.

महाराजांनी त्याला जरबेत घेणारा खलिता धाडला पण चंद्ररावाला जावळिच्या घनदाट अरण्याची गुर्मी चढली होती त्याने महाराजांना उलटा मुजोर जबाब पाठवला **"येता जावळि ... जाता गोवळि! पुढे एक मनुष्य जिवंत माघारा जाणार नाही! तुम्हांमध्ये पुरुषार्थ असला, तर उदईक येणार ते आजच या! ..... येथे उपाय कराल तर तो अपाय होईल!"** तरीही महाराजांनी समजावणारी अजून एक थैली पाठवली **"..... जावळि खाली करोन, हात रुमाल बांधोन, भेटीस येवोन हुजूराची चाकरी करणे! इतकियावरी बदफैली केलिया मारले जाल!"** चंद्ररावाने मग्रुर उत्तर पाठवले - **" ..... जावळिस येणारच तरी यावे! दारुगोली महजूद आहे!"** महाराजांचा संयम संपला. स्वत: जातीने महाराज जावळित उतरले. यशवंतरावाचा माज उतरला. घाबरुन तो "रायरी" किल्यावर जाऊन लपला. अखेर या झगड्यात इ.स. १६५६ मध्ये शिवरायांनी मोरे घराण्याकडुन जावळी जिंकुन घेतली. याच मोहिमेत महाडचे मुरारबाजी देशपांडे शिवरायांच्या सेवेत आले.ते चंद्रराव मोऱ्यांकडून लढत होते पण महाराजांनी त्या हिऱ्याला स्वराज्यासाठी हाक दिली आणि त्यांनी पुरंदर प्रकरणापावतो स्वराज्याची सेवा केली. महाराजांना जावळि मोहिमेत असे हिरे आणि बेलाग चीरे गवसले त्यातलाच एक "रायरी".



मोऱ्यांचा प्रमुख यशवंतराव मोरे जावळीहून पळून रायगडावर जाऊन राहिला तर प्रतापराव मोरे विजापूरास पळाला. महाराजांनी ६ एप्रिल १६५६ रोजी रायरीस म्हणजेच रायगडास वेढा घातला व मे महिन्यात रायरी महाराजांच्या ताब्यात आला. "**सके १५७७ संवत्सरी पौष शुध्द चतुर्दस राजश्री सिवाजीराजे याणी देशमुखाचा जमाव घेऊन जाऊन जाऊली घेतली. चंदरराऊ पळोन राइरीस गेले. तेथे राजश्री स्वामीनी किलीयास वेढा घातला. वैशाखमासी सके १५७८(एप्रिल-मे १६५६) शिवाजी राजे भोसले याणी रायरी घेतली. समागमे कान्होजी जेधे देशमुख ता भोर व बांदल व सिलींबकर देशमुख व मावळचा जमाव होता. हैबतराऊ व बालाजी नाईक सिलींबकर याणी मध्यस्ती करुन चंदरराउ किलियाखाली उतरले**" अशी नोंद जेधे शकावलीत आहे. पण चंद्ररावाला विनाशकाले विपरीत बुध्दि सुचली. महाराजांच्या छावणीत आश्रित राहुन त्याने विजापुरशी संधान बांधले. त्याच्या "गुफ्तगु" करणाऱ्या थैल्या महाराजांच्या जासूदाने मधल्यामध्ये पकडल्या. चंद्रराव छावणीतुन निसटला. पण कुठे जाणार होता? पकडला गेलाच. अखेर शिक्षा म्हणून त्याची गर्दन मारली, त्याची बाजी वा कृष्णाजी हि मुले देखिल मारली. जावळि निष्कंटक झाली.

शिवरायांनी गड घेतला तेव्हा त्यास गडाचे स्वरूप जवळपास नव्हते असेच म्हणावे लागेल. दक्षिणेत मुस्लिम सत्ता येण्याआधी हा किल्ला कोणा मराठे पाळेगाराच्या ताब्यात होता व चौदाव्या शतकात त्याने विजयनगरचे मांडलिकत्व स्वीकारले होते. पुढे निजामशाहीत गड शिर्क्यांच्या ताब्यात होता, गडावर आजही "शिर्काई" देवीचे मंदिर आहे ते बहुदा याच कळातले असावे. या काळात रायगडाचा उपयोग कैदी ठेवण्यापुरता होई. मग किल्ला विजापूरकरांकडे आला व पुढे शिवाजी महाराजांकडे. रायगडची निरनिराळया कालखंडातील कागदपत्रात, आज्ञापत्रात, बोली भाषेतील वेगवेगळी १५ विश्वासजन्य नावे उपलब्ध आहेत – १)रायरी २)तणस ३)राशिवटा ४)नंदादिप ५)इस्लामगड ६)रायगिरी ७)राहिर ८)मामले रायरी ९)उत्तमगड १०)सरखा ११)रेडि १२)राजगिरी १३)राजदुर्ग १४)शिवलंका १५)पूर्वेकडिल जिब्राल्टर

शिवरायांनी राजगड सोडुन रायगड निवडला त्याबाबत शिवदिग्विजय प्रकाश टाकते. शिवराय आग्र्याहुन सुटुन आले, काही महिन्यांनी मथुरेत गुप्तपणे राहणारे शंभूराजे देखिल सुखरुप राजगडि पोहोचले. या आनंदाच्या घटनेप्रित्यर्थ जिजाऊ साहेबांनी मेजवानी देण्याचे ठरविले काही महिन्यांनी राजकारणातून फुरसत मिळताच त्यांनी मेजवानीचा बेत केला. बारा मावळातल्या तालेवार देशमुखांना राजगडावर बोलावले शिवदिग्विजयबखर सांगते - "ते समयी कारभारी यांणी मोठा चवरंग होता, त्याजवरी कचेरीत गादी ठेवुन जागा उंच



करविली. नंतर दुतर्फा मंडळी बसली त्यांत मोहीते, महाडिक, शिर्के, निंबाळकर, घाटगे, जाधव आदीकरुन जमा झाले होते. त्याणी महाराजांची जागा उंच करुन गादि घातली हे पाहून इर्षा वाटली की, आता आंम्हा मराठ्यांस सभ्य थोर, मोठेपणा शिवाजीराजे यांजकडे आला. आम्ही कदिम तालेवार, राजे, मोर्चेलाचे अधिकारी असतां ...... असें असता अमर्यादपणानी उंच स्थळी बसणार. आम्हि सेवकभाव दाखविणार. त्यास आम्हांस कचेरीत बसावयाची गरज काय? म्हणोन बोलोन उठोन चालिले ...... नंतर बाळाजी आवजीस महाराजांनी विचारले. पुढे योजना कोणते प्रकारे करावयाची, ती सांगा. त्यावरुन विनंती करते जाले कीं **"महाराज या नावांस छत्रसिंहासन पाहीजे. त्याशिवाय राजे म्हणविणे अश्लाघ्य, लाजिरवाणे,खुशामती बोलणे. स्वयंभू पदवी असली म्हणजे खुशामत जसे ईश्वर शोभेप्रत पावतात, तशीच पदवी जो छत्रसिंहासनाशिश राजा असतो ..... छत्रसिंहासन असलें म्हणजे, या लोकांची बोलणी शिशुपालवत् सभेचे ठायी होतील. समयावच्छेदे नाशही पावतील"** ...... कशी योजना सांगा म्हणता; काशीस गागाभट्ट, महासमर्थ ब्राह्मण, तेजोराशी, तपोराशी, अपरसूर्य, साक्षात वेदोनारायण, महाविद्वान, त्याजकडे कोण पाठवून तेथे गोष्टिचा उपक्रम करुन त्यांचे आज्ञेने जे करणे ते केले असतां राजमान्य निर्बाध होते." या घटनेनंतर **महाराजांनी राजधानी हलविण्याचे कारणे –**

१) शास्ताखानाच्या स्वारीच्यावेळि त्याच्या स्वारांनी अगदि गडाखालपर्यंत येऊन जाळापोळ केली होती. शिवाय मावळांतील सगळे देशमुख राजांना शरण आले नव्हते.

२) रायगड कोकणात दुर्घट जागी होता. त्यावर शत्रूला आक्रमण करायचे झाल्यास सह्याद्रिची हजार-बाराशे मीटरची भिंत ओलांडणे क्रमप्राप्त होते. शिवाय रायगडच्या आसपासचे शिर्के, मोरे, दळवी हे महाराजांना संपूर्ण शरण आले होते.

३) आरमार स्थापन झाल्याने समुद्रावरच्या हालचालीवर अणि व्यापारावर नियंत्रण ठेवायला समुद्राला तुलनेनी जवळ असलेली राजधानी गरजेची होती. कोकण- घाट दोहोंवर जास्त भक्कम पकड बसवता येणे शक्य होते.

महाराजांनी बेलाग बुलंद असलेल्या रायगडची निवड केली ती पारखूनच सभासद बखर म्हणते - **"राजा खासा जाऊन पहाता गड बहुत चखोट, चौतर्फी गडाचे कडे तासिल्या प्रमाणे दिड गाव उंच. पर्जन्यकाळि कडियावर गवत उगवत नाही आणि धोंडा तासिव एकच आहे. दौलताबादही पृथ्वीवर चखोट गड खरा, परंतु उंचीने तो थोडका. दौलताबादचे दशगुणी उंच देखोन संतुष्ट जाले आणि बोलिले - तख्तास जागा हाच गड करावा."**

सभासद रायगडाबाबत अजुन लिहितो - "**रायगड पहाडी किल्ला चांगला. आजुबासुन शत्रूची फौज बसावयास जागा नाही. घोडे माणूस जाण्यास महत् संकट. वरकड किल्ले पन्हाळे बहुत. पण खुलासेवार व मैदान मुलुखात. यास्तव आजच्या प्रसंगास हीच जागा बरी. येथे लवकर उपद्रव होऊ न शकेल.**" इथुन पुढे निर्वाणापर्यंत महाराजांचे वसतीस्थान रायगडच होते.

पाचाड हे पायथ्याचे मुख्य गाव. त्यावेळि पाचाडला खूप महत्व होते. रायगड परीसरातील घोडदळ पाचाडात उभे असे. दुसरे महत्व असे कि पुढे वृध्दापकाळी जिजाऊसाहेबांना गडावरचा पावसाळि - हिवाळि गार वारा सोसवेना म्हणून त्यांना पाचाडात एक वाडा बांधून दिला होता आजही त्याचे अवशेष आहेत, तक्याची विहीर आहे. शिवाय पाचाडात जिजाऊसाहेबांची समाधी आहे. तिथुन बघितलं कि रायगडचे रुद्र टकमक टोक दिसते. त्याकाळि तो मातृभक्त राजा कदाचित टकमकवरुनच त्या वाड्याच्या दिशेने नमस्कार करीत असावा. राज्याभिषेकानंतर नऊच दिवसांनी जिजाऊसाहेब निवर्तल्या त्या देखिल पाचाडातच, तेव्हा या मातीवर शिवछत्रपतींचे पृथ्वीमोलाचे अश्रू सांडले असतील. या परीसराला हळव्या नात्यांचा परीसस्पर्ष आहे तो असा. या खेरीज कोंझर, रायगडवाडि, छत्री निजामपूर, कावल्या - बावल्याची खिंड अश्यां आटोपशीर गावांनी, खुणांनी रायगडला वेढले आहे.

रायगड चढताना पहिल्यांदा लागतो तो खुबलढा बुरुज. तेथे चित दरवाजाही होता पण आता तो नाही. अरे हो ..... खुबलढा बुरुजासमोर सध्या ST बस थांबा आहे त्याच्या पाठीमागे एक वाट जाते. ती एका गुहेपर्यंत जाते. त्या गुहेला २ मोठी खिंडारे आहेत व खाली खोल दरीतला दूरवरचा प्रदेश सहज नजरेत येतो. त्याला "वाघबिळ" किंवा "चित्त्याचे डोळे" म्हणतात. शत्रुवर नजर ठेवायला उत्तम जागा आहे. तसेच खुबलढा व समोर दिसणाऱ्या टकमकच्या बेचक्यात "नाना दरवाजा" आहे. "नाना" याचा बोली भाषेतील अर्थ "लहान" किंवा "दुय्यम" म्हणता येईल पण दुय्यम असून नेहमीच्या राबत्यासाठी हाच वापरला जात असावा. इ. स. १६७४ च्या मे महिन्यात राज्याभिषेकाच्या निमित्ताने इंग्रजांचा वकील "हेन्री ऑक्झेंडन" याच दरवाजाने वर आला होता. पुढे वाटेत मदारी मेहतर मोर्चा लागतो. आणि मग येतो महादरवाजा. जय आणि विजय या दोन भरभक्कम बुरुजांच्या गोमुखी रचनेत तो लपला आहे. दोन्हि बुरुज बुलंद असून जवळपास एक ७५ फूट तर दुसरा ६५ फूट आहे. व बुरुजांकडून एक तटाबंदि टकमककडे तर दुसरी हिरकणी बुरुजाकडे गेली आहे. हेच काम बघून इंग्रज वकिलाला "पुरेसा धन्यसाठा असल्यास अत्यल्प शिबंदिसह हा गड संपूर्ण जगाविरुध्द लढू शकतो" असे वाटले असल्यास नवल नाही.

महादरवाज्याचे काम हा युध्द वास्तूशास्त्रातील अति उत्तम नमुना म्हणायला हवा. हा महादरवाजासुध्दा असा बांधला आहे कि त्यावरही वरुन सहज लक्ष ठेवता येईल. नीट बघितले तर लक्षात येते कि महादरवाज्यचे स्थान गंगासागर व हत्ती तलाव यांच्या बेचक्यातील आहे - गडावरचा पाण्याचा साठा महत्वाचा असला तरी जर गरज पडलीच तर हे दोन तलाव फोडल्यास कितीही मोठ्या संखेने शत्रु आला तर यांच्या जलप्रपातात सहज वाहुन जावा. सध्या गळती लागल्याने हत्ती तलाव कोरडा असतो. गंगासागर मात्र वर्षभर पुरुन उरेल इतके पाणी साठवतो.

गडावर अनेक अवशेष आहेत. काही सुस्थितीत आहेत काही मोडकळिच आले आहेत. मात्र २ अनमोल गोष्टि म्हणजे "राजदरबार" व "श्री शिवछत्रपतींची समाधी". सातशे वर्षांच्या भिषण रात्रीनंतर स्वातंत्र्यचा सूर्योदय इथेच झाला. चार पातशाह्यांच्या छाताडावर पाय देऊन एक "हिंदु राजा पातशहा जाहला हि गोष्ट सामान्य नव्हे." गडावरील या राजसभेत ता. ६ जून १६७४, ज्येष्ठ शुद्ध १३ शके १५९६, शनिवार या दिवशी राज्याभिषेक संपन्न झाला.राजदरबारापासून हुजुरबाजार (बाजारपेठ) मार्गे जगदिश्वरमंदिरापर्यंत ताशे - कर्णे यांनी गजबजलेली व मोर्चेल, सोन्याची अंबारी, दोहो बाजुंनी ढळणाऱ्या चवऱ्या यांनी सुशोभित "शिवछत्रपतींची" मिरवणूक निघालेली रायगडाने बघितली व शके १६८० च्या हनुमान जयंतीला याच वाटेने त्या महापुरुषाची अंतयात्रा निघालेली सुध्दा बघितली. स्वराज्याचे राष्ट्राचे परमोच्च सुख व पराकोटिचे दु:ख दोन्ही या शिखराने अनुभवले आहे. जगदिश्वराच्या मंदिरसमोर आजही तो पुरुषोत्तम चीरनिद्रा घेत पहुडला आहे. रायगडावर सर्वात जास्त वेळ कुठे द्यावा तर तो समाधीजवळ. इथे भल्याभल्यांचा अहंकार आपसूक गळून पडतो. एखाद्या पौर्णिमेच्या चंद्रप्रकाशात समाधीसमोर शांतपणे बसणं हा शहाणं करणारा अनुभव असतो. शक्य झाल्यास तो जरुर घ्या.

तसेच राजगडावरील हुजूरबाजार (बाजारपेठ) हा महाराजांच्या दूरदृष्टिचा उत्तम नमुना म्हणावा लागेल. ती रोजची बाजारपेठ नव्हे. तर देशभरातील मुख्य व्यापाऱ्यांचे मुतालिक तेथे वसवावेत आणि त्यांच्याकडून त्या वस्तूंचे वेगवेगळे नमुने उपलब्ध केले जात असावेत. व मोठ्या व्यवहाराची बोलणी तिथे होऊन सावकार सौदा पक्का करत असावा. व थैली सीलबंद करुन सरकारात कर भरणे, वाटेत माल अडवला जाऊ नये म्हणुन व्यापाऱ्यांना परवानगीची पत्रे देणे अशी कामे येथे होत असावीत.

यावर आज्ञापत्रातील साहुकार प्रकरण प्रकाश टाकते - **"साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा. ....साहुकाराचे संरक्षणात बहुत फायदा आहे..... पेठांपेठांत दुकाने वखारा घालोन हत्ती, घोडे, नरमिना, जरबाब, पशमी आदि करुन वस्त्रजात व रत्ने व शस्त्रे आदिकरुन अशेष वस्तुजात यांचा उदिम चालवावा. हुजूरबाजारामध्येही थोरथोर सावकार आणोन ठेवावेत..... त्यांसी अनुकुल न पडे तरी असतील तेथचे त्यांचे समाधान रक्षून आपली माया त्यांस लावून त्यांचे मुतालिक आणून त्यांस अनुकुल ते जागा, दुकाने देऊन ठेवावे."** पण महाराज किती दक्ष, सावध व लोकांची अचूक पारख असलेले हो्ते हे आज्ञापत्रातील पुढच्या ओळींतून समजते टोपिकर म्हणजे युरोपिय व अरब व्यापाऱ्यांबाबत आज्ञापत्र म्हणते - **"सावकारांमध्ये फिरंगी इंगरेज वलंदेज फरासीस डिंगमारादि टोपीकर हेही लोक सावकारी करितात. परंतु ते वरकड सावकरांसारिखे नव्हेत. त्यांचे खावंद प्रत्यक प्रत्यक राज्यच करतात ..... <u>राज्य करणारास स्थळलोभ नाही यैसे काय घडो पाहते?</u> ..... त्यांची आमदफ्तरी आलेगेले ऐसेच असो द्यावी, त्यांसी केवळ नेहमी जागा देऊ नये. जंजिरेसमिप या लोकांचे येणे जाणे सहसा होऊ देऊं नये.. ... कदाचित वखारेस जागा देणे जाहलेच तर खाडिचे सेजारी समुद्रतीरी न द्यावा.... आरमार पाठीसी देऊन त्यांचे बळे बंदरी नुतन किल्ला करणारच, तेव्हा तितके स्थळ राज्यातून गेलेच."** थोडक्यात दख्खनचा व समुद्रावरचा व्यापार महाराजांना आपल्या पंखाखाली घ्यायचा होता. नुसतीच तलवारच नव्हे तर तराजू देखिल तितकाच महत्वाचा असतो हे महाराज उमजून होते. म्हणुनच २२ - २२ गाळे असलेला ४४ दुकानांचा संसार वरती रायगडावर मांडला होता.

रायगडावरच्या वास्तूंविषयी एकुणच खूप लिहिता येईल पण लेखाचे विस्तारभय आहेच मात्र त्या प्रत्यक्षात जाऊन बघणे उत्तम. रायगडचा शिवकालोत्तर इतिहास जाणून घ्यायचा तर - शके १६०२ रौद्र संवत्सर माघ शु. ७, इ. स. १६८१ १६ फेब्रुवारी या दिवशी रायगडावर छत्रपती संभाजी महाराजांचे विधिपूर्वक राज्यारोहण झाले. या छाव्याने शत्रुंवर केलेली पंजेफाड हि विस्मयकारक आहे. मात्र छत्रपती शंभूराजांना स्वस्थता अशी लाभलीच नाही. त्यांचा एका ठिकाणी फारवेळ गेलाच नाही राज्यारोहण वगळता त्यांची रायगडाशी संबधित "ठळक" घटना क्वचितच असावी. मात्र पुढे औरंगजेबाने छत्रपती शंभुराजांना पकडल्यावर व त्यांची हालहाल करुन हत्या केल्यावर, स्वराज्याची जबाबदारी छत्रपती राजाराम महाराजांवर आली. इ. स. १६८४ च्या सप्टेंबरमध्ये औरंगजेबाने रायगडच्या मोहिमेस सुरुवात केली. शहाबुद्दीन खान यास चाळीस हजार सैन्यासह बादशाहने रायगडाच्या पायथ्याशी धाडले. मात्र त्याने गडाच्या पायथ्याशी असलेल्या एका गावाला आग लावली व लुटालूट

चालू केली. पण प्रत्यक्ष रायगडावर हल्ला न करता तो १६८५ च्या मार्चमध्ये परतला. म्हणूनच मग औरंगजेबाने आपला वजीर आसदखान याचा मुलगा इतिकादखान उर्फ झुल्फिकारखान यास सैन्य देऊन रायगड घेण्यास पाठवले.

५ एप्रिल १६८९ रोजी राजाराम महाराज रायगडावरून निसटून प्रतापगडावर गेले. पुढे जवळजवळ आठ महिने हा वेढा चालू होता. या वेढ्याला यश मिळावे म्हणून औरंगजेबाने कवी कलशचा मुलगा व एक मराठी सरदार यांच्याकडून रायगडाचे मेणाचे "मॉडेल" बनवुन घेतले होते म्हणे. अखेर दि. ३ नोव्हेंबर १६८९ रोजी सुर्याजी पिसाळ या किल्लेदाराच्या फितुरीमुळे किल्ला मोगलांना मिळाला. वाईची देशमुखी देण्याचे आमिष दाखवून खानाने त्यास फितुर केले. झुल्फिकारखान हा बादशाहने इतिकादखानला दिलेला किताब आहे. पुढे रायगडचे नामांतर 'इस्लामगड' असे झाले.औरंगजेबाने हा किल्ला घेतला खरा पण तो सांभाळणे त्याला जड होऊन बसले. कारण गायकवाड, गोळे यांसारखे स्वराज्याचे पाईक, कांगोरी किल्यावरुन त्याला सतावत होतेच. गड मिळुनही जीवाला स्वस्थता लाभेना. दिल्लीतले नियम मराठ्यांच्या गल्लीत लागू होत नव्हते ... होणारही नव्हते. अखेर वैतागुन त्याने किल्ला जंजिऱ्याचा सिद्दिअ खैरीयतखान याला दिला. मराठ्यांना दुर्दैवाने जंजिरा कधीच जिंकता आला नाही, पेला ओठाशी आला म्हणतानाच दरवेळि तो उडवला जात असे. मात्र सिद्यांनी गडावर जवळपास ४० वर्षे फतकल मांडली होती. अखेर ५ जून १७३३ या दिवशी शाहूमहाराजांच्या कारकिर्दीत रायगड पुन्हा मराठांनी घेतला.

पुढे पेशवे कालात नाना फडणवीस किल्यावर अनेकदा येऊन गेल्याचा उल्लेख आहे. मात्र कोल्हापुर - सातरा अश्या दोन गाद्या तयार झाल्या, आणि पेशव्यांमुळे सगळय भारताचे राजकारण पुण्यात ठरवले जाऊ लागले. साम्राज्य विस्तारल्याने आक्रमणाचे भय संपले व रायगड सारखा बुलंद डोंगरी किल्ला परत मोठ्या युध्दात कधी वापरावा लागला नाही. मात्र त्याला शेवटचे युध्द खेळावे लागले इंग्रजांशी. पण १८१८ मध्ये हा किल्लासुध्दा इंग्रजांच्या ताब्यत गेला. इंग्रजांनी धार्मिक भावनांना थेट कधी ठेच पोहोचवली नाही मात्र "राष्ट्रिय अस्मिता" जागविणारी अनेक ठिकाणे त्यांनी तोफांचा मारा करुन पाडली त्यात रायगडही होता. कारण "शिवाजी" या नावाची आठवण सुध्दा इथल्या लोकांना नविन उभारी देऊ शकते हे त्यांना माहीत होतं.

आज आपण स्वतंत्र आहोत, पण ते स्वातंत्र मिळवण्याची उर्मी छत्रसाल बुंदेल्यापासून थोरल्या बाजीरावांपर्यंत आणि नरवीर उमाजी नाईकांपासून ते सुभाषबाबुंपर्यंत अनेकांना प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष शिवछत्रपतींनीच दिली. ते स्वातंत्र्य आता आपल्याला टिकवायचे असेल, आणि रयतेच्या काडिलाही धक्का न लावणाऱ्या "जाणत्या राजाला" थोडसं ओळखायचा प्रयत्न करायचा असेल तर प्रत्येकाने आयुष्यात किमान एकदा रायगडला नक्कि जावे.

*"शिवरायांचे आठवावे रुप । शिवरायांचा आठवावा साक्षेप ।*
*शिवरायांचा आठवावा प्रताप । भूमंडळी ॥"*

****************************************

## - संदर्भ –

१) महाराष्ट्राची धारातिर्थे - पं महादेवशास्त्री जोशी
२) राजगड बखर - श्री अप्पा परब
३) हुजूरबाजार - श्री अप्पा परब
४) राजा शिवछत्रपती - बाबासाहेब पुरंदरे
५) शककर्ते शिवराय - श्री विजयराव देशमुख

# ** ट्रेकसाठी उपयुक्त टिप्स **

ट्रेक म्हटलं की उमेदीच्या पहिल्या काही वर्षांतला बराचसा वेळ सॅक भरण्यातच जातो. मला आठवतंय, माझ्या एका मित्राने एका ट्रेकला चक्क बादली आणली होती! खायला, चघळायला काय घ्यावं इथपासून कपडे, शूज कोणते घालावेत, आयत्यावेळेला उपयोगी पडतील अशी साधने कोणती, रानामधल्या वनस्पती-झाडांचे ट्रेकमधले उपयोगी गुणधर्म याबद्दल माहिती देणारा लेख आपण "दुर्ग दुर्गट भारी"मध्ये कायमस्वरूपी प्रकाशित करणार आहोत. पुढच्या वेळी निघताना याची एक प्रिंट घेऊन ठेवा की झालं! सुरुवात करूया अगदी प्राथमिक टिप्स पासून. लवकरच आपण त्यांची सुधारित आवृत्ती प्रसिद्ध करणार आहोत.

१) ज्या किल्ल्यावर जाणार असाल तिथल्या वाटा, आजूबाजूच्या भूभागाची माहिती, चढायला लागणारा वेळ, राहण्याची सोय याची माहिती गोळा करा आणि घरच्यांनाही देऊन ठेवा. ( 127 hrs आठवतोय ना? ;))

२) प्रमाण नकाशे मिळालेच तर प्रिंट घेऊन जा. वाटा शोधण्यात त्यांचा खूप उपयोग होतो.

३) आपल्याला संपूर्ण वेळ उचलता येईल इतपतच सॅक भरा. आवश्यक त्याच गोष्टी सॅकमध्ये असाव्यात. उदा, ज्या पातेल्यात चहा करायचा त्यातच तांदूळ भिजवता येतील, अथवा एकच ताट झाकण म्हणूनही ठेवता येईल आणि तांदूळ धुवायला सुद्धा वापरता येईल.

४) कुठल्याही ट्रेकमध्ये टॉर्च, काडेपेटी, (मुक्कामी/नाईट ट्रेकमध्ये मेणबत्त्या) चाकू, (स्विस नाईफ असल्यास उत्तम), रद्दी पेपर, दोर, या गोष्टी घ्याच.

५) पायामध्ये ग्रिप असणारे शूज आवश्यक. सर्वात महत्त्वाचे म्हणजे, चढण-उतरण शूजच्या नव्हे तर आपल्या पायांच्या बळावर करणार आहोत हे ध्यानात ठेवावे. त्यामुळे आत्मविश्वासाने पाऊल टाकणेही आवश्यक आहे. पण तरीही, निसरड्या, उभट भूभागावर शूज अतिरिक्त मदत देतात.

६) मुक्कामी ट्रेकमध्ये झोपण्यासाठी कॅरीमॅट उत्तम! वजनाला हलक्या, आटोपशीर असतात.

७) जेवण शिजवून खाण्याची वेळ आल्यास ट्रेकची मजा अजून वाढते. बाहेर पाऊस कोसळतोय, गुहेमध्ये चुलीचा सगळा धूर भरून राहिलाय, अंधारात, टॉर्चच्या प्रकाशात जेवण शिजतंय, त्याचा घमघमाट भूक चाळवतोय, पातेली कुणी घासायची यावर एका बाजूला वाटाघाटी सुरू आहेत.. अर्थात हल्ली रेडी टू कूक ची पॅकेट्स उपलब्ध असतात. नसल्यास पोहे, मॅगी, डाळ/पिठलं-भात. मुगाच्या डाळीची खिचडी हे पदार्थ भूकही भागवतात आणि कमी वेळात तयारही करता येतात. फावल्या वेळात चघळण्यासाठी खजूर, बिस्कीटे, चिक्की सुद्धा घेऊन ठेवा. जांभळे, करवंदांच्या मोसमातला ट्रेक असेल तर मग काय वर्णावी धम्माल महाराजा?

## ** ट्रेकसाठी उपयुक्त टिप्स **

८) प्रत्येकाकडे किमान एक मोठी बाटली पाणी असणे आवश्यक. उन्हाळ्यात २ सुद्धा कधीकधी पुरेनाशा होतात. शिवाय बाटलीचा आपत्कालिन परिस्थितीत 'दाना'साठीही उपयोग होतो तो वेगळाच! :)

९) आपल्या आजारांबद्दल, ऍलर्जीबद्दल प्रत्येकाला माहिती असतेच. त्यानुषंगाने औषधे बरोबर ठेवा. एसटी लागणे, उन्हात फिरल्यास पित्त वाढणे, गवत-झाडीतून फिरल्यास रॅशेस उठणे इ त्रासांना नेहमीच टाळता येणं शक्य नसलं तरी उपाय करता येतात. सर्वासाधारणपणे एक फ़र्स्ट-एड बॉक्स एकाकडे असावा. त्यात ताप-सर्दी-पित्त यावरच्या गोळ्या, भाजल्यास-खरचटल्यास लावायचे मलम, कापूस, बॅंडेज, सोबतीला छोटी कात्री, दोरा, कोरडी फडकी इ साहित्य ठेवावे. ट्रेकमध्ये जबाबदारीने वागल्यास अपघात टाळता येतात हे खरेच. तरीही खबरदारी म्हणून ही औषधे!

१०) सर्वात शेवटी सर्वात महत्त्वाचे, ट्रेकमध्ये निसर्गाला, रानातल्या पशु-पक्ष्यांना, त्यांच्या अधिवासाला धक्का पोहोचेल असे कुठलेही कार्य करू नका. रात्री गोंधळ, गोंगाट, मद्यपान करून धिंगाणा करणे या गोष्टींसाठी ऐतिहासिक किल्ल्यांपेक्षा इतर उत्तम जागा या जगात भरपूर आहेत. दरीतून येणारा वाऱ्याचा आवाज, पक्ष्यांची मंजूळ किलबिल, उन्ह-पावसाचे खेळ, आणि यातलं काहीच नसेल तरी निखळ आणि नितळ शांतता यातलंही सौंदर्य अनुभवण्यासारखं असतं!

तसेच अशा ऐतिहासिक ठिकाणी स्वत:ची नावे लिहून येण्यासारखा नामर्दपणा दुसरा नाही. दस्तुरखुद्द शिवछत्रपतींचे नाव एकाही गडावर त्यांनी लिहिले अथवा लिहून घेतलेले नाहीये ही गोष्ट पुरेशी सूचक नाही का?

ट्रेकींगच्या आनंददायी अनुभवासाठी डोंगरभर शुभेच्छा!

तर दोस्तांनो,

ही होती मराठ्यांच्या ऐतिहासिक राजधानी रायगडाची ई-सफर.

पुढच्या अंकात भेटू अशाच एका तुमच्या आमच्या आवडीच्या किल्ल्यावर!

शुभास्ते पन्थान: सन्तु ।

## ** ऋणनिर्देश **

फोटो - आनंद राजगोळे

नकाशा - www.trekkshitij.com

रायगडचा फेरफटका - http://mr.wikipedia.org

आणि

"शिवतीर्थ रायगड - दुर्ग दर्शन", लेखक - आनंदा राजगोळे

तख्तास जागा हाच गड करावा... - सौरभ वैशंपायन

(http://sahajsuchalamhanun.blogspot.com)

## ** आवाहन **

हा नवीन उपक्रम कसा वाटला ते आम्हाला जरूर कळवा. तसेच आपल्या ट्रेकसाठी या महितीचा आपल्याला कसा उपयोग झाला तेही जाणून घ्यायला आम्हाला आवडेल. यात अजून काय आणि कशी सुधारणा करता येईल तेही सांगा. तुम्हाला अशी एखाद्या गडाची ओळख करून द्यायला आवडेल ?

या गडाबद्दल किंवा बृहन्महाराष्ट्रातल्या कोणत्याही गड किल्ल्याबाबत आपणाकडे माहिती फ़ोटो असल्यास कृपया आमच्याशी संपर्क साधा. पुस्तिकांची ही मालिका अधिकाधिक समृद्ध होण्यासाठी आपली मदत हवी आहे. तसेच गडकिल्ल्यांशी संबंधित काम करणारा आपला काही ग्रुप वगैरे असल्यास आम्हाला आपली माहिती कळवा. आपला किंवा आपल्या माहितीतल्या कुणाचा ब्लॉग, वेबसाईट यांचीही लिंक पाठवा. निवडक दर्जेदार लेखन आम्ही आपल्या नावासहित प्रसिद्ध करू.

आज इवलिसी दिसणारी ही पुस्तिका कालांतराने एक संदर्भ ग्रंथ बनावी अशी इच्छा आणि योजना आहे. आणि हे आपल्या मदतीशिवाय अशक्य आहे.



आपल्या सर्व प्रकारच्या प्रतिसादांसाठी

durgabhari@gmail.com